शैक्षणिक वर्ष २०१४-२०१५ सिंहगड एज्युकेशन सोसायटीचे, सौ.वेणुताई चव्हाण पॉलीटेक्नीक, वडगाव-आंबेगाव (बु), पुणे या संस्थेतील इन्फॉर्मेशन टेक्नॉलॉजी हा अभ्याक्रम बंद करण्यास शासन मान्यता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मान्यता-२०१५/(६०/१५)/तांशि-५**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय विस्तार भवन मुंबई-४०० ०३२.**
**तारीख: १५ जूलै, २०१५.**

**वाचा**

१) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. क्र.१०/एनजीपी/अभ्या.बंद/२०१५ /३३९, दि. २०.४.२०१५.

२) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. क्र.१०/एनजीपी/अभ्या.बंद/२०१५ /३३९/५४९, दि.२०.६.२०१५.

**प्रस्तावना**

संदर्भाधिन दि.२०.६.२०१५ च्या संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई यांच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने शैक्षणिक वर्ष २०१४-१५ पासून सिंहगड एज्युकेशन सोसायटीचे, सौ.वेणुताई चव्हाण पॉलीटेक्नीक, वडगाव-आंबेगाव(बु), पुणे या संस्थेतील इन्फॉर्मेशन टेक्नॉलॉजी हा अभ्यासक्रम बंद करण्यास शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

शैक्षणिक वर्ष २०१४-१५ पासून अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मान्यतेनुसार सिंहगड एज्युकेशन सोसायटीचे, सौ.वेणुताई चव्हाण पॉलीटेक्नीक, वडगाव-आंबेगाव(बु), पुणे या पदविका संस्थेतील इन्फॉर्मेशन टेक्नॉलॉजी प्रवेशक्षमता ६० हा अभ्यासक्रम बंद करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१) या संस्थेतील बंद करावयाच्या अभ्यासक्रमांच्या संबंधित सर्व दस्ताऐवज जसे की गुणपत्रिका, उत्तरपत्रिका, निकालपत्रे, विद्यार्थ्यांचे पत्ते, फीच्या पावत्या इत्यादी बाबी संस्थेने मंडळाकडे सूपूर्द करणे आवश्यक राहील.

२) संबंधित अभ्यासक्रमासाठी नियुक्त शिक्षक वर्ग/कर्मचारी यांच्या सेवाविषयक व इतर बाबतीत न्यायप्रविष्ठ असलेली सर्व प्रकरणांची जबाबदारी संस्थाप्रमुखांची राहील. भविष्यकाळात कोणतेही न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास त्यास सर्वस्वी संस्था जबाबदार राहील.

३) संस्थेकडून शासनाची वसुली अद्यापी थकबाकी असल्यास त्याचा भरणा करणे संस्था प्रमुखांवर बंधनकारक राहील.

४) संस्थेमध्ये सदर अभ्यासक्रम राबविण्यासाठी आवश्यक स्थावर जंगम मालमत्तेविषयी या संस्थेने शासनाकडून किंवा कोणत्याही वित्तीय संस्थेकडून कर्ज घेतले असल्याचे यापुढे निदर्शनास आल्यास त्याची परतफेड करण्याची सर्वस्वी जबाबदारी संस्थेची राहील.

५) संस्थेतील संबंधित अभ्यासक्रम बंद केल्यानंतर त्या संस्थेतील प्रवेशित विद्यार्थ्यांना व माजी विद्यार्थ्यांना परिक्षेस बसण्याची इच्छा असल्यास त्याची पर्यायी व्यवस्था करणे संस्थेवर बंधनकारक राहील.

६) संबधित अभ्यासक्रमांसाठी नियुक्त केलेल्या संस्थेतील शिक्षक व कर्मचारी यांना देय असलेले वेतन, वेतन भरपाई व अन्य आर्थिक प्रदानाचे भुगतान करणे संस्थेस बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१५१४३४४५१९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DHARURKAR SANJAY AUDUMBAR

Digitally signed by DHARURKAR SANJAY AUDUMBAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=H AND T E,CID - 917065, postalCode=400032, st=Maharashtra, cn=DHARURKAR SANJAY AUDUMBAR
Date: 2015.07.20 11:39:30 +05'30'

**(संजय औ. धारुरकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, वांद्रे (पू), मुंबई-५१.

३. सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय (सर्व), (संचालक, तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

४. संबंधित संस्था ( संचालक, तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

**प्रत माहितीसाठी-:**

१. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, ७वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली ११०००१.

२. सहाय्यक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण विभाग), पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डिंग, दुसरा मजला, चर्चगेट, मुंबई.